सन २०१७-१८ या चालू आर्थिक वर्षासाठी पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पूरक- २०१७/प्र.क्र.१२०/का-८,**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ७ सप्टेंबर, २०१७

**वाचा:** १. वित्त विभाग परिपत्रक क्र. पूरक-२०१७/प्र.क्र.१२९/अर्थ-३ दि. १८.८.२०१७.
२. वित्त विभाग परिपत्रक क्र. अर्थसं २०१७/प्र.क्र.९४/अर्थ-३ दि. ३०.०६.२०१७
३. आयुक्त, महिला व बाल विकास यांचे मबाविआपु/बावि/पु.मागणी/२०१७-१८/का-५/३४५० दि.२१.६.२०१७.

**प्रस्तावना :-**

सन २०१७-१८ या चालू आर्थिक वर्षामध्ये जुलै, २०१७ च्या विधीमंडळ अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी संदर्भाधीन क्र. १ च्या परिपत्रकाद्वारे वितरणास उपलब्ध करण्यात आला आहे. एकूण अर्थसंकल्पित निधीच्या ७० टक्के या प्रमाणात निधी वितरणास उपलब्ध होत आहे. त्यानुसार -बाल न्याय अधिनियमान्वये शासन प्रमाणित गृहे व सुधारगृहे याचे परिरक्षण करणे॰ या योजनेसाठी पुरवणी मागणीद्वारे एकूण मंजूर तरतूदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत तरतूद वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. आता या शासन निर्णयान्वये सन २०१७-१८ या चालू आर्थिक वर्षासाठी मागणी क्रमांक एक्स-१, मुख्य लेखाशिर्ष २२३५,सामाजिक सुरक्षा व कल्याण, १०२, बाल कल्याण, (०१)(०४) बाल न्याय अधिनियमाअन्वये शासन प्रमाणित गृहे व सुधारगृहे व यांचे परिरक्षण करणे,(२२३५ ३०३२)(अनिर्वाय) अंतर्गत पुढील योजना व संगणक संकेतांकांतर्गत अर्थसंकल्पित निधी वितरित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

(रू.लक्ष)

| अ. क्र. | योजना व लेखाशिर्ष व उद्दिष्ट्ये | | सन २०१७-१८ अर्थसंकल्पित तरतूद | वितरणास उपलब्ध निधी (७० टक्के) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | | ३ | ४ |
| १ | बाल न्याय अधिनियमान्वये शासन प्रमाणित गृहे व सुधारगृहे यां परिरक्षण करणे (अनिवार्य) (२२३५ ३०३२) | | | |
| | ०६ | दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | ३८.२३ | २६.७६ |
| | ११ | देशांतर्गत प्रवास खर्च | ३.०० | २.१० |
| | १३ | कार्यालयीन खर्च | २.०० | १.४० |
| | १४ | भाडे पट्टी व कर | १७.१७ | १२.०२ |
| | १९ | आहार खर्च | ३३३.०० | २३३.१० |
| | २१ | पुरवठा सामग्री | ६९.६० | ४८.७२ |
| | **एकूण (२२३५ ३०३२)** | | **४६३.००.००** | **३२४.१००** |

२. महिला व बाल विभागांतर्गत, बाल न्याय (मुलांची काळजी व संरक्षण) अधिनियम, २०१५ च्या तरतूदींच्या अनुषंगाने विधी संघर्षग्रस्त बालके व काळजी व संरक्षणाची गरज असलेली बालके यांना निवासी व इतर सुविधा पुरविण्याच्या अनुषंगाने शासकीय संस्था कार्यरत आहेत. सदर शासकीय संस्थांच्या प्रलंबित देयकांच्या अनुषंगाने संदर्भाधीन पत्र क्र. ३ अन्वये शासनास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. त्या अनुषंगाने उपरोक्त रकाना क्र. ४ प्रमाणे उपलब्ध निधी प्राथम्याने खर्च करण्यात यावा.

३. शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतूदींपेक्षा अधिकचा खर्च होणार नाही याची काळजी नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी. या रकमा खर्च करताना राज्य शासनाची कार्यनियमावली, वित्तीय नियमावली व या विभागाच्या तसेच वित्त विभागाच्या वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचनांचे तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन परिपत्रकातील सर्व अटी /शर्तीचे पालन करण्यात यावे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१७०९०८१२३२३७२०३० असा आहे. सदरचा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Smita Dattatray Nivatkar

Digitally signed by Smita Dattatray Nivatkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3fa46cf1e928518ffc98619187a1ef6de2dd57c16934e9cb6672cc02aa258b08, cn=Smita Dattatray Nivatkar
Date: 2017.09.08 12:22:19 +05'30'

**( स्मिता निवतकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर.
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
५) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी.
६) वित्त विभाग (व्यय-६), (अर्थसंकल्प-७), मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
७) कक्ष अधिकारी, (का-४), महिला व बाल विकास विभाग, मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
८) निवड नस्ती/का-८.